समयादिक पात्रें व शस्त्रें व धनुष्यें व आतपत्रें व चामरें व व्यजनें व इक्षु वपुष्पें व पुस्तकें व कलश व ग्रामभूमि व अमोप द्रव्य व वापिका व गृहदानें देऊन संपर्ण ब्राम्हणांस व गोरगरीब फकीरांस अपरमित संतुष्टविलें. अग्रहारें यावत् चंद्र-सूर्य तावतत्काल ब्राम्हणांस धरा अर्पण केली.

ऐसे शिवाजी महाराज नरचूडामणी नरदेही उत्पन्न जहालियापासून देहावसान पावेतों अद्वितीय असाधारण अमानुषी कृतकर्म पटुतर प्रौढ प्रताप महीमंडलांत अखिल युगयुगांतरांचे ठायीं पुण्यश्लोक गरिमा दिवादिकल्प गर्जना करीत आहे. शिवाजी महाराज साक्षात श्रीविष्णु अंशअवतारी, पुन्हा सृष्टिकर्ते, यांणीं जगविख्यात अभिनव विक्रमोपराक्रमाची अभिवृद्धता करून नवीन शक सिंहासनाधीश्वर जहालियांपासून परंपरा शिवनृपतिशक धराभुवनीं रूढला आहे. धन्यता शिवाजी महाराजांची ! या कलियुगीं अप्रतिम, उपमाच नाहीं. संपूर्ण नर्मदेपासून श्रीरामेश्वरपर्यंत एकछत्री एकाज्ञा रामराज्य करून कीर्ति संपादली. तदनंतर चौऱ्यायशीं बंदरें फिरंगी देश व अरबदेश व नायमारें देश व चंगदेश व वलंदेजाचा देश व हबसाण वगैरा टोपीकर करभार भिऊन देऊं लागले. मुलुख काबीज केला. अदलशाही व कुतुबशाही निजामशाही व समुद्रांतील बावीस पादशहा यांसि शिक्षास्पद करून जिंकिलें. नवेंच राज्य शिवाजी महाराजांनीं पैदा केलें. मराठे यांचे क्षत्री होऊन सार्वभौम छत्रपति हिंदुपति बादशहा सिंहासनाधीश्वर महाराज जहाले. अंतीं स्वइच्छा मरण संपादून कैलासभुवनास गेले. याप्रमाणें पूर्वी जहाले नाहीं. हें समस्त महाराजांचें वंशकुलास व समस्त जनांस महाराजांचा महाप्रताप कळला असावा.

हें पुण्यश्लोक शिवाजी महाराज छत्रपति जनेश्वर यांचें चरित्र जो कोणी भक्तीनें नित्य श्रवण करील त्यास ऐश्वर्य पराक्रम व धर्म यश दान कीर्ति जय भक्ति चारण [ ! ] बुद्धि सत्कर्म धैर्य चातुर्य गांभीर्य शौर्य तूर्य माधुर्य अ धीय अमोघ संपत्ति पुत्रपौत्रादि प्राप्त होऊन श्री भागीरथीस्नान व गयावर्जन व संपूर्ण तीर्थे व तीर्थराज स्नानाचे पुण्याचा फलादेश घडोन येईल. निपुत्रिका पुत्र होतील. निर्धनासि धन होईल. अपेशी यशवंत होतील. रोगिप्राणियाचे रोग परिहार होतील. शत्रु किंकर होतील. पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें सुखरूप असतील.

हें शिवआख्यान अनंतपुत्र कृष्णनाम याणें केलें. चंद्रीमध्यें ईश्वरनाम संवत्सर चैत्र शु॥ प्रतीपदा तद्दिनीं बखर महाराजांची समाप्त जहाली. गत शालिवाहन शके १६१६ सोळाशें सोळा. अनंत कृष्णाजींनीं निर्मिली. तदनंतर

६१. नायमार=नाईर लोक असावे.


अनुक्रमणिका

बावन होते. त्यापैकीं एक पुत्र बुद्धिसिंग यानें राजास विनंति केली कीं, आपण सहपरिवार झाडींत लोहगड आहे तेथें जावें. मी बंगसाकडे जातों. तेथें जैशी कवायत घडेल तसें फरीन आणि बातमी तुम्हांस लिहीत जाईन. ह्याप्रमाणें विनंति केली. ती राजास मान्य झाली. त्यावरून सहपरिवारें लोहगडास गेला. बुद्धिसिंग शंभर स्वार घेऊन बंगसाकडे गेला. नजर देऊन भेटला आणि वर्तमान सांगितलें कीं, छत्रसाल माझा पिता यास मी बहुता प्रकारें सांगितलें कीं, बंगससाहेबांस भेटून बंगससाहेबांचे हातें पातशाहाची भेट घेणें म्हणजे सर्व बंदोबस्त होईल. म्हणून मी किती प्रकारें सांगितलें! परंतु न ऐकतां झाडून झाडींत पळून गेले. मी साहेबांकडे आलों. त्यास कळेल त्याप्रमाणें करावें. मी राज्यांतील माहितगार आहें. चार किल्ले जबरदस्त आहेत ते सर करून देतों. असें ऐकून बंगसानें बुद्धिसिंगाची खातरजमा करून मेजवानी केली आणि १००० रुपये दिले. बंगसास सांगितलें कीं, जयपुर किल्ला तुम्हांस देववितों. असें म्हणोन बंगसाची फौज घेऊन किल्ला लढून घेतला. ठाणें बंगसाचें बसविलें. एक दिवशीं राजपुत्र बोलला कीं, पन्हा किल्ला घ्यावा. त्याजवरून त्याजबरोबर फौज देऊन तोफा वगैरे पोख्त सामान देऊन रवाना केला. त्यानें येऊन पन्हा किल्ल्यास वेढा घातला. किल्लेदार पानोसिंग बापाचे हातचा त्यास लिहून पाठविलें कीं, तुम्ही निघून जावें. किल्लेदार पानोसिंग येऊन भेटला. किल्ला द्यावा असा करार करून राजपुत्र लष्करांत आला. तोफेचे मोरचे देऊन किल्ल्यावर हल्ला करून किल्ला घेतला. बंगसाकडील चार भले मनुष्य वर चढविले. ठाणें बसविलें. राजपुत्र बंगसाकडे आला. बंगस सुप्रसन्न होऊन जडावाचीं कडीं व मोत्यांची कंठी व तुरा व शिरपेंच देऊन पंचवीस हजार रुपये दिले. राजपुत्रानें सांगितलें कीं, पन्हा किल्ला आपला आहे व शहर चांगलें आहे तेथें जाऊन रहावें. नंतर राणीपुरा चांगला किल्ला आहे तो ही हस्तगत करून देतों अशी मसलत करून पन्हा शहरास बंगस जाऊन राहिले. हें वर्तमान बुद्धिसिंग यानें कोणास न कळतां छत्रसालास लिहून पाठविलें कीं तुम्ही सर्व फौज सिद्ध करावी. जे दिवशीं लिहूं ते दिवशीं दाखल व्हावें. असें लिहून पाठविलें आणि राणीपुरा किल्ला तो ही घेऊन दिला. अर्ज केला कीं मुलूख आपले हाताखालीं आहे. फौज कशास पाहिजे. असें सांगून फौज दहा हजार ठेविली. पन्नास हजार फौज दिल्लीकडे लावून दिली. छत्रसालास नेम लिहून पाठविला. त्याप्रमाणें चाळीस हजार फौज घेऊन छत्रसाल पन्हाशहरास आला. घेरा घातला. बाजीराव धांवदाणा घेत होते ते ही येऊन पोहोंचले. बंगस व चार कारभारी सुद्धां

किल्ल्यांतच होते. छत्रसाल यांणीं किल्ला घेतला. बंगस व चौघे कार-भारी कैद केले. बाहेर बंगसाची फौज होती ती बाजीराव साहेब यांनीं लु-टली. राजा पूर्ववत प्रमाणें किल्ल्यावा झाडून बंदोबस्त करून राज्य करूं लागला. बाजीराव साहेब यांची बहुत प्रकारें मुदारत येऊन एक कळवंतीण मस्तानी खूपसुरत नजर दिली आणि खंडणी देऊन शिवाय मुलूख बुंदेल-खंडचा दिला व राजापासून मुलूख घेतला व जाटांपासून मुलूख घेतला. ए-कूण पन्नास लक्षांचा मुलूख सर केला. सरकारचा अंमल पाहिजे या-स्तव याजवर अंमल करण्यास कोण योजावा याची तजवीज होती. जवळ कोणी मनुष्य नाहीं. यामुळें गोविंद शागीर्द खरे कराडा होता. त्यास वि-चारिलें. त्यानें सांगितलें कीं आपली आज्ञा झाली तर मी हजर आहे. त्यास तेथें ठेविलें. त्यानें मुलखांत ठाणीं बसवून शिवाय मुलूख काबीज केला. सु-भेदारी कर्ते झाले. तेव्हा बुंदेलखंडांत खरे याचा अंमल सुरू झाला. बाजीराव साहेब दरमजल साताऱ्यास आले. तीस हजार फौज जवळ ठेविली. नि-वेंद झाले.

कोठें रहाण्यास जागा पाहून किल्ला बांधावा व यजमानापासून दूर असावें म्हणून बाजीराव साहेब लोहगांवास आले. दोहीं नद्यांचा संगम पाहून पु-णेवाडी लोहगांव परगण्यांतील तेथें किल्ला बांधावयास सांगितलें. निम्मे कि-ल्ला तयार झाल्यावर राजआज्ञा झाली कीं, संगीन काम पुरतें न करावें. त्या-जवरून काम पुरतें न झालें. राज्यकारभार साताऱ्यास चालूं लागला. चिमा-जी आपा साहेब स्वारीची तयारी करून हिंदुस्थानांत गेले. उज्जनीस दया-शिंग सुभेदार होता त्याजवर जाऊन लढाई मातबर करून सुभा बुडविला. मुलूख सरकारांत घेतला. महाराजांचे राज्याची वृद्धि करीत चालले. मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे हे उभयतां सरदार सलाबतीचे [ त्यांनीं ] दिवसें-दिवस राज्य आक्रमिलें. त्या स्वारीहून देशीं आल्यावर महाराजांचे दर्शनास गेले.

कोंकणांत शामलानें उपद्रव करून तमाम किल्ले घेतले. त्याजवर मोहीम करावयाची मर्जी महाराजांची. परंतु जंजिरा समुद्रांत हस्तगत होणें कठीण व गड व किल्ले मजबूत. तेव्हां कांहीं फितूर असावा याजकरितां शेख सुभेदार होता त्याजकडे राज्यकारण करून फितूर केला. शेखजीचें व सिद्दीचें चि-त्त शुद्ध नव्हतें. याजमुळें फितूर करावया जागा झाली. राजपुरीस दाखल झाल्यावर पन्नास हजार रुपये द्यावें असा करार करून ठेविला. सिद्दी याकुब वारले. ते समयीं त्यांचा वडील पुत्र सिद्दी सुरोन याकुद बावा आबूल



अनुक्रमणिका

जंजिऱ्यांत राहिला. धाकटा लेक सिद्दी अबूल रहिमान मुरदा दहन करावयाकरितां राजपुरीस आला. तों सिद्दी अबूल व सिद्दी याकूब व सिद्दी अमर व सिद्दी रहावर या चौघांनीं थोरल्याला जिवें मारून जंजिऱ्याचे दरवाजे घेऊन किल्ला बळकाविला. सिद्दी अबूल रहिमान मुरद्याबरोबर आला तो राहिला. त्या समयीं वकिलाचें पत्र श्रीमंत बाजीराव पेशवे यांस येतांच कूच करून मोठमोठ्या मजली करून राजपुरीस दाखल झाले. जंजिऱ्यांत खबर पोहोंचतांच सिद्दी रहावर लोकांसुद्धां बाहेर आला. बरुजऱ्यावर लढाई होऊन सिद्दी रहावर पडला. रावसाहेबांच्या मोरच्यांवर फत्तेसिंग भोंसले व राव प्रतिनिधी होते. किल्ले कोट अवचितगड, सुरगड, बिरवाडी, तळें, घोसाळें, श्रीसंगमेश्वर कऱ्हाड, महाड, रायगड घेतले. सिद्दी अबूल रहिमान सांपडला. तो सहा महिने रावसाहेब यांजवळच होता. नंतर तह करून सिद्दी अबूल रहिमान यास जंजिऱ्यांत तक्तावर बसवून आपले किल्ले माघारे घेतले. पैकीं रायगड व महाड हुजूर महाराजांनीं ठेवून वरकड किल्ल्यांचा बंदोबस्त रावसाहेब यांनीं केला. त्याचें राज्य सात लक्षांचें होतें त्या पैकीं एक लाख रुपये खंडणी करार करून बाकी सहा लक्ष त्याजकडे ठेविले. तह करून पुण्यास येऊन राजदर्शनास गेले.

कान्होजी आंग्रे सरखेल कुलाब्यास होते. ते शके १६५२ विरोधकृतनाम संवत्सर या सालीं वारल्यावर त्यांचे वडील पुत्र सखोजी आंग्रे शके १६५९ प्रमोदीनाम संवत्सरे या सालांत वारले. धाकटे संभाजी आंग्रे विजयदुर्गास होते. ते कुलाब्यास येऊन धोंडजी आंग्रे यांस कुलाब्यास नेऊन बंदोबस्त करून विजयदुर्गास गेले. संभाजी आंग्रे व मानाजी आंग्रे यांचा पेंच होता. त्यामुळें संभाजी आंग्रे पळोन आले. फिरंग्याचे आश्रयास रेवदंड्यास गेले. संभाजी आंग्रे विजयदुर्गाकडे गेल्यावर मानाजी आंग्रे कुलाब्यास जाऊन किल्ला हस्तगत करून [राहिले] हें वर्तमान संभाजी यांस कळतां च आरमार सुद्धां धांवून आले. ते समयीं मानाजी आंग्रे यांचें पत्र येतांच बाजीराव साहेब व आपासाहेब निघोन दरमजल जाऊन कुलाब्यास पोंचले. मानाजी आंग्रे यांची कुमक [केली] ते समयीं राजमाची व कोयळा हे किल्ले, बेरेटी व छत्तिसी हे दोन महाल, सरकारांत घेतले. नंतर पुण्यास आले. राजदर्शनास गेले.

त्यावर बसईसाष्टीकडील भेद आला. यास्तव हाशमी मावळे लोक

---

१४ बाजीराव.

१५. ग्रांट डफ साहेब कान्होजी इ स. १७२८ त म्ह० शके १६५० वारला असें म्हणतात.

१६. इ. स. १७२१त असें ग्रांट डफ म्हणतो.



अनुक्रमणिका

कोंकणे चाकरीस ठेवून खंडोजी मानकर व रामाजी महादेव यांस पाठविले. त्यांनीं नलद जाऊन कल्याणची खाडी उतरून जाऊन साष्टी घेतली. शंकराजी केशव यांस वसईस रवाना केलें. ते गोखिवऱ्याचे शहराजवळ जाऊन राहिले. हें वर्तमान गोव्यास फिरंगी यांस कळलें. फिरंग्यांनीं तयारी केली. ती बातमी इंग्रजास मुंबईस आली. त्यांनीं पत्र बाजीराव साहेबांस पाठविलें कीं, तह करावा नाहीं तर फिरंगी येऊन साष्टी घेतो. मसलतीस खर्च केला तो व्यर्थ होऊन लोक मारले जातात. त्याचें उत्तर समर्पक पाठवून ते च समयीं मल्हारजी होळकर यांस साष्टीस कुमकेस पाठवून दिले. ते जाऊन पोहोंचले. तों फिरंगी जहाजांची तयारी करून साष्टीस पाणबुरूजाजवळ आला. ते समयीं साष्टीवरून तोफांची मारगिरी करून जहाजांवर दोन कप्तान होते ते गोळ्यानें ठार पाडले. जहाजें निघून गेलीं. कदाचित फिरोन फिरंगी येईल याजकरितां गोव्यास पायबंद बसवावा म्हणून त्र्यंबकराव नारायण घोरपडे हजार फौजेनिशीं पाठविले. त्यांनीं साष्टीवरदेश मारून मुलुख तारण केला. त्याजवर आपासाहेब व राणोजी शिंदे [यांनीं] वसई प्रांतीं जाऊन शिरगांवतारापूर घेतलें. ते समयीं बाजी भिमराव कामास आले. सदहू किल्ल्याचा बंदोबस्त करून वसईस आले. किल्ल्यास मोरचे देऊन सुरुंग खणोन किल्ला जेर केला. त्या समयीं बादशाही इराणीहून दिल्लीवर चढाई करून आला. तेव्हां फौजेविषयीं पादशाहाचा फरमान आला. त्याजवरून बाजीराव यांचें पत्र आपा साहेबांस गेलें कीं, वसईचे मोरचे राखून दिल्लीच्या स्वारीस येऊन मातबर कार्य करावें येविषयीं महाराजांची आज्ञा झाली आहे. त्याचें, वसईचा शह सोडावयाची मर्जी आपासाहेबांची नाहीं असें, उत्तर आलें. यामुळें दिल्लीस जाणें न झालें. नादरशाहा इराणी दिल्लीस येऊन दिल्ली लुटून सवा प्रहर कत्तल करून खजिना घेऊन गेला. वसईच्या मसलतीस मुबलख पैका रावसाहेब यांनीं पाठविला. वसई किल्ल्यास मोरचे देऊन सुरुंग खणून किल्ला जेर केला. गोव्याची कुमक न येई तेव्हां फिरंगी किल्ला देऊन गोव्यास जाऊन पूर्तकालास गेला. आपासाहेब वसईचा सुभा शंकराजी केशव व सारणीचा सुभा खंडोजी मानकर याजकडे सांगून आपण सरदारांसुद्धां पुण्यास आले. वसईच्या मसलतीस बारा चौदा हजार माणूस स्वार हशम कामास आले. आपासाहेब यांनीं वसईच्या मसलतीस भगीरथ प्रयत्न करून फिरंगाण हस्तगत करून धर्मराज्य हिंदुधर्माची स्थापना केली.

दसरा जाहाल्यावर फौज तयार केली. वाड्याचें काम पुण्याचें चालू

---

१७. इ. स. १७३८ त. | १८. इ. स. १७३९ त.



अनुक्रमणिका

होतें. मस्तानीचा महाल तयार करविला आणि जागजागां चौक, सदरा, जामदार-खाने व शिलेखाने व तोफखाने, कोठी तयार करविली. मस्तानी कळवांतीण छत्रसाल राजानें दिली ती बाजीराव साहेबांनीं राखिली होती. बाजीराव साहेब फौज तयार करून हिंदुस्थानांत गेले.

इकडे संभाजी आंग्रे फिरून कुलाब्यास आले. ते समयीं मानाजी आंग्रे यांचे पुत्र येतांच आपासाहेब दर मजल कूच करून कुलाब्यास गेले. तुळाजी आंग्रे संभाजी आंग्रे यांजबराबर होते. युद्धप्रसंग होते समयीं तुळाजी आंग्रे यांस धरून नेलें. मानाजी आंग्रे बनायतमहा यांपासून पाली व मिरगड सरकारांत घेतला. आपासाहेब पुण्यास आले. बाजीराव साहेब श्री-ओंकारमानधाता प्रांतास आले. चार दिवस मुक्काम होता. एके दिवशीं शरीरीं ज्वर येऊन सातवे दिवशीं मृत्यु पावले. क्रियाकर्मांतर तापीतीरीं केलें. कारभारी फौज घेऊन देशीं आले. आपासाहेब यांस हें वर्तमान समजतांच पुण्यास आले. शके १६६२ रुद्रनाम संवत्सरे या सालीं परलोकास गेले. काशीबाईस व सातारेकर राजे यांस बहुत दुःख झालें. त्यांस पुत्र येणेंप्रमाणेः—

१ बाळाजीपंत ऊर्फ नानासाहेब; २ जनार्दनपंत ऊर्फ अण्णा; ३ रघोबा ऊर्फ दादासाहेब; येणेंप्रमाणें खाशी मंडळी तीन व चवथा मस्तानीचा समशेर बहादर. येणेंप्रमाणें होते. आपासाहेब पुण्यांतच होते. नानासाहेब साताऱ्यास शाहूमहाराजांचे दर्शनास गेले. महाराज शाहू [यांनीं] कृपावंत होऊन वस्त्रें प्रधानपंत यांचीं दिलीं. नंतर पुण्यास आले.

आबाजीपंत बापू पुरंदरे यांचे पुत्र महादेव बावा पुरंदरे यांस नानासाहेब यांजबराबर देऊन हिंदुस्थानांत रवाना केलें. पिलाजी जाधव व मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे व यशवंतराव पवार [असे] कितीएक सरदार समागमें होते. हिंदुस्थानास जाऊन शत्रूचा पराभव करून त्या वर्षीं छावणी करून दुसरे वर्षीं बागलाणांत स्वारी केली. त्या प्रांतीं रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा होते. त्यांची व श्रीमंतांची गांठ पडून युद्धप्रसंग होऊन भोंसले यांस लुटिलें. बागलाणची खंडणी दरसाल करार करून माघारे फिरले. आपासाहेब पुण्यास होते. त्यांस व्यथा होऊन शके १६६५ चें सालीं कैलासवासी झाले. त्यांस पुत्र एकः—

१ सदोबा ऊर्फ * भाऊसाहेब.

---

१९. ही बाजीरावाची पत्नी.

२०. इ. स. १७४१.

२१. ग्रांटडफ साहेब हे चिमणाजी आपा इ. स १७४१ त म्ह. शके १६६३ त वारले असें म्हणतात.

* यांचें जन्म इ. स. १७३१ त झालें होतें.

नाना साहेब स्वारी करून पुण्यास आले. राजदर्शनास गेले. रघोजी भोंसले ही आले. आठ महिने बखेडा पडला. तेव्हां नाना साहेबांची व भोंसल्यांची समजूत महाराजांनीं करून दिली. तेथून निघून पुण्यास आले. जनार्दनपंत हे मृत्यु पावले. सदोबा भाऊ, राघोबा दादा, व समशेरबहादर पुण्यांत वाड्याचें काम चालत होतें तेथें रहात होते. बाळाजीपंत नाना सातार्‍यास जाऊन दरबार करीत होते. परशरामपंत प्रतिनिधि पूर्वीं होते ते वारल्यावर[२२] श्रीपतराव प्रतिनिधि करूं लागले. कारभार चालला. परंतु बाजीराव साहेब होते तेव्हां चढती दौलत होती. हल्लीं द्रव्य कोणीकडून येईनासें झालें. खर्चाची तंगचाई पडली. सबब दाभाडे यांस हुजूर बोलावण्याकरितां पत्रें पाठविलीं. परंतु दारू पिवून मस्त तो येईना. तळेगांवास स्वस्थ बसले. महाराजांनीं प्रधानास बोलावून सांगितलें कीं खर्चाची तंगचाई पडली. प्रांतांत फौज पाठवून चवथाईचा पैका आणवावा तर फौज घेऊन दाभाडे तळेगांवीं स्वस्थ बसले. त्यांस धरून आणवून फौज पाठवून प्रांतांतील जमा आणवा. त्याजवरून अष्ट प्रधानांनीं विचार केला कीं, फौज पाठवून धरून आणावें तरी फौज त्याचे स्वाधीन. तेव्हां सावकाराकडून कर्ज काढून फौज ठेवून धरून आणावा. ही मसलत अवघड आहे अशी अष्ट प्रधानांनीं विनंति केली. त्याजवरून राजास वाईट वाटून महालांत जाऊन बाजीराव यांचा कारभार आठवून त्याचे पुत्र बाळाजीपंत नानासाहेब यांस बोलावूं पाठविलें. तेव्हां नानांची उमर २५ वर्षांची होती व सदोबा भाऊंची उमर २० वर्षांची होती. राजा जवळ गेले. राजांनीं सांगितलें कीं, दाभाडे धरून आणिले पाहिजेत. याची तजवीज काय ? त्यांनीं उत्तर केलें कीं, साहेबांचे हस्त मस्तकीं असल्यास सर्व घडून येईल. राजा शाहू यांनीं हिंमतीचें उत्तर ऐकून संतोष होऊन बाळाजी पंताचे मस्तकीं हात ठेविला. उद्यांना दाभाडे धरून आणितों म्हणून नाना बोलले. महाराजांनीं विजयी होणें म्हणून विडे नानांस देऊन वाटे लाविलें. भाऊ व नाना तेथून निघून रानदरबारास आले. मानकरी सरदार हुजूर रहात होते त्यांस सर्वत्रांस राजाज्ञा जाहीर केली कीं, दाभाडे धरून आणिले पाहिजे. मानकरी यांनीं उत्तर केलें कीं, आम्हीं जातीनें शेंपन्नास आहोंत. आमचे स्वार दाभाडे यांजपाशीं चाकरीस आहेत. असें मानकरी यांनीं सांगितलें. नंतर बाळाजीपंत नानांनीं सांगितलें कीं तुमचे लोक तेथें आहेत त्यांत तुमचे भाऊबंद इष्टमित्र सोयरे धायरे आहेत. त्या सर्वत्रांस सांगून पाठवावें

---

२२. शके १६६८ म्ह. इ. स. १७४६त | २१. इ. स. १७२० त.



अनुक्रमणिका

कीं, आम्ही लटाईस आलों असतां तुम्ही हत्यार धरूं नये. असें सांगून फितूर करविला. आणि बाळाजीपंत नाना यांनीं मानकरी यांस विचारलें कीं, हिंदुस्थानास रावसाहेब गेले होते त्याजबरोबर गुजरात खेरीज करून इतलाख लोक होते ते दूर केले. त्यांची नांवनिशी कोण कोठें कोणत्या गांवास आहेत तें सांगावें. त्याजवरून माहितगारी विचारून घेऊन पांचशें जासूद तयार करून राजाज्ञेचीं पत्रें येण्याविषयीं पाठविलीं. शिपाई धनगर मल्हारराव होळकर चाळीस हजार फौज घेऊन राजआज्ञेप्रमाणें दाखल झाले. मानकरी यांनीं दाभाड्यांकडील वीस हजार फौज फोडली. एकूण साठ हजार फौजेचा मेळ झाला. नानांनीं राजास विनंति केली कीं, फौज तयार आहे. राजांनीं आज्ञा केली कीं दाभाडे यांस धरून आणावें.

आज्ञा घेऊन होळकराकडे आले. राजाज्ञेचें पत्र देऊन राजाज्ञा सांगितली. होळकरानीं मान्य केली. नाना व मानकरी वाणीउदमी व कारकून व चाकरमाने उमेदवार होते ते सर्व पांच हजार जमा करून होळकर व मानकरी सुद्धां साताऱ्याहून कूच करून फौजेनिशीं तळेगांवावर आले. हें वर्तमान दाभाडे यांस कळलें. फौज सिद्ध करून गांवाबाहेर फौजेचा फरा धरून उभे राहिले व हेही सन्मुख फरा धरून उभे. कोणी कोणावर हत्यार टाकिलें नाहीं. तिसरा प्रहर झाला. दाभाडे अंबारींत होते. घोड्यास वगैरे पाणी पाजावयाकरितां दाभाडे तळ्याकडे गेले. यांनीं "हरहर महादेव" म्हणून उठावणी केली. तों दाभाड्याचे लष्करांतील वीस हजार फौज यांचे लोकांत मिळाली. दाभाडा ही सांपडला. त्यास धरून मारून लुटालुटी करून धरून साताऱ्यास आणिलें.

महाराजाकडे बाळाजीपंत नाना गेल्यावर शाहू महाराज [यांनीं] फार कृपावंत होऊन प्रसन्न होऊन नानांस शिक्केकटार दिली. शिक्क्यांतील नांव येणेंप्रमाणें:--"राजा शाहू छत्रपती हर्षनिधान, बाळाजी बाजीराव मुख्यप्रधान" असा शिक्का हाली केला. सर्वांत पेशवे हा किताब दिला. वस्त्रें अलंकार देऊन विडे दिले. पुढें कामकाज राज्यकारभार नानांचे विचारें होऊन राज्याचा व खासगी खर्चाचा व फौजेचा बोभाट [ त्यांनीं ] पडूं दिला नाहीं.

पूर्वी बाजीराव यांनीं जागोजाग सरदार पाठविले होते. ते कांहीं मरून गेले. अमलांत मोंगल मवासी बदलून होते. तेव्हां बाळाजीपंत नानांनीं यशवंतराव घोरपडे यास बोलावून सांगितलें कीं, पूर्ववत् प्रमाणें फौज धरून कर्नाटक प्रांतीं विजापूर सुभा घेऊन कडपे, कर्नाळें, शिरशाहापूर, बागलकोट एथील पठाण

बदललेले आहेत त्यांची खंडणी जेर करून घेऊन श्रीरंगपट्टण, चित्रदुर्ग, वगैरे येथील खंडण्या घेऊन त्या प्रांतीं असावें. पैका साताऱ्यास पाठवावा. तुमचे मदतीस गोपाळराव हरी यांस पाऊण कोटीचा मुलूख सरंजामास देऊन शिरजेस पाठविलें आहे. काम पडल्यास तुम्हांस मदतीस येतील. असें सांगून घोरपडे यांस कर्नाटकांत रवाना केलें. राणोजी कवडे मेले. त्यांचा पुत्र आवजी कवडे यांस भागानगर प्रांतीं पूर्ववत् प्रमाणें फौज सुद्धां पाठविलें. पेशजीं राजाचे हातच्या सनदा तुम्हांजवळ आहेत त्याप्रमाणें बालेघाट वगैरे चौथाई पुंड पाळेगार सर करून पैका घेणें. जानोजी[२४] भोंसले यांनीं कर्नाटकांत राज्य काबीज करून जातीनें लढाई करून राज्य आक्रमिलें. पुढें अक्कलकोटास जाऊन राहिले. कान्होजी भोंसले चाळीस हजार फौज घेऊन वऱ्हाड प्रांतीं अलिचपूर गोंडवण येथील अंमल करून नागपुरास राहिले. जवळ मुलूख दीड दोन कोटींचा झाला. संभाजी राजे कोल्हापूरचें राज्य वीस लक्षांचें सुमारें घेऊन करवीरीं राहिले. प्रतिनिधि श्रीपतराव सरंजामाचा मुलूख घेऊन कऱ्हाडास राहिले. सचीवपंत भोरचें ठाणें बसवून भोरास राहिले. राघोबा दादा यांस हिंदुस्थानांत पाठविलें. पन्नास हजार फौज व तोफखाना, मल्हारराव होळकर व शिंदे[२८] यांजला बरोबर देऊन रवाना केलें. लाख फौज समागमें झाली. शिंदे पुढें पंचवीस हजारानिशीं अघाडीस, होळकर तीस हजारांनिशीं पिछाडीस, चालत. दरकूच शरयूतीरास गेले. तेथून साठ कोस दिल्ली होती. त्या प्रांतीं मुलाजफखां पठाण चाळीस हजार फौजेनिशीं होता. तो मल्हारराव होळकर यांजवर चढून आला. दादा साहेबांस समजलें. जयाजी शिंदे यांस कुमकेस पाठविलें. तों अगोदरच होळकरांनीं पठाणास मोडून फौज लुटून फस्त केली. पठाण पळाला. दोनशें अंबारी जनानखाना होता तो दादासाहेब यांजकडे पाठविला. त्याची जप्ती करून कूच केला. नखकडी शहरास सुजातदौला मातबर होता. त्यास विषम वाटलें कीं, पठाणांच्या बायका दक्षणी घेऊन जातात. आपली मुसलमानांची अब्रू जाते. म्हणून त्या बायकांची खंडणी वीस लक्ष रुपये देऊन सोडविल्या. दादासाहेबांनीं रुपये घेऊन हत्तीसुद्धां बायका सोडून दिल्या. तेथून कूच करून दरोबस्त प्रांतांतील खंडण्या घेऊन परतले.

२४. हाच फत्तेसिंग भोंसला असावासें दिसतें.

२५. इ. स. १७१३ पासून संभाजी करवीरीं राहूं लागले. ते इ. स. १७६० त वारले.

२६. श्रीपतराव इ. स. १७२० पासून १७४७ पर्यंत.

२७. इ. स. १७[illegible]५ त.

२८. जयाप्पा.

स्वरें त्याची आज्ञा घिउनि मुल गेलें चि सदनीं ।
चणाक्षांचीं पाळीं रिचवुनि फके घेत वदनीं ॥ ६९ ॥
रिकामीं तीं पाळीं करुनि मुल आलें झडकरी ।
म्हणे आई जेऊं उठुनि मज घालीं लवकरी ॥
म्हणे माता आतां तुजप्रति चणाक्षांसि दिधलें ।
म्हणे आई तेणें वदुनि लटकें ची झकविलें ॥ ७० ॥

**स्रग्धरा.**

वार्ता ऐकोनि कानीं झडकरि सदनीं चक्रि गेला उठोनी ।
पाळीं पाहे पुराणीं न दिसति नयनीं बोलिला कोण हानी ॥
तेव्हां तो म्लानवाणी गडबड धरणी लोळतो एक कोनीं ।
आई या हो कुमोरें मम कण गृहिंचे भक्षिले सत्य मानीं ॥ ७१ ॥
येका संवत्सराचे मम कण गृहिंचे भक्षिले या कुमारें ।
गाईनें रत्नमोल्या गिळियल असे काय कीजे विचारें ॥
चक्री मातीस जातां स्थिर करुनि म्हणे मृत्तिका आणि भीमा ।
तेणें त्या मृत्तिकेचे युगकरिं धरिले पिंड लोपीत व्योमा ॥ ७२ ॥
एक्या पिंडासि तेणें स्थळ करुनि म्हणे दूसरा दूर टाकीं ।
तेव्हां ते कौरवांचे चमुवर स्वकरें भीम तेथूनि झोंकी ॥
तेणें कित्येक मेले तुरग रगडले वीर विस्मीत झाले ।
रायें धाडूनि दूता त्वरित नृपसभे ते क्षणीं मेळवीले ॥ ७३ ॥
आले ते सर्व राजे स्वयंवरिं वदती कीर्ति ज्यांची विराजे ।
भिष्मादी कर्ण दुर्योधन सह शकुनी पातले नीज फौजे ॥
येती शास्त्रज्ञ वेदीं निपुणतर ऋषी ज्योतिषी धांवताती ।
ते काळीं पांच बंधू जननिस नमुनी मंडपा शीघ्र येती ॥ ७४ ॥

**कामदा.**

दाटली सभा देखुनी उभा । ठाकुनी ह्मणे दाखवीं प्रभा ॥
चाप घेउनी बाण लावुनी । नोवरी वरा यंत्र भेदुनी ॥ ७५ ॥

**श्येनी.**

भेदित्यासि तीन बाण दीधले । भोंवते सहस्त्र मल्ल ठेविले ॥
भेदितांचि तीन बाण चूकती । त्यांसि मल्ल हे कढेत टाकिती ॥७६॥

**कामदा.**

रूप येकटें पाहुनी बरें । लक्षुनी मिना भेदिजे शरें ।
× × × × × × × × × × ॥ ७७ ॥

## श्येनी.

ऐकतां चि शंखवर्णे बोलिला । कोण जीव हा चि देल आपुला ॥
सैवरें अनंत पूर्वीं ऐकिलीं । ऐशि जीवआट नाहिं देखिली ॥ ७८ ॥
राजया विदेह प्राप्त ते सिता । तो म्हणे सुचाप लावि जो सिता ॥
त्यासि कन्यका मि सत्य दीधली । चाप भंगितां चि राघवा दिली ॥७९॥
द्वापरीं युगीं च जाण भीमकें । रुक्मिणी दिली हरीस कौतुकें ॥
सैवरें अनंत वर्णुं मी किती । कोणि घातले न तैलि भूपती ॥ ८० ॥
कन्यका विधीस आवडे मनीं । तो म्हणे फिरेल हे चि मेदिनी ॥
त्यासि दीधली च हे मनोरमा । ज्ञानि जाणुनी च अर्पि गौतमा ॥८१॥
कन्यका तुम्हां बहूत आवडे । नित्य पाहिजे चि लोचनांपुढें ॥
त्या निमित्य फार विघ्न निर्मिलें । ऐकतां नृपें हि काय बोलिलें ॥८२॥

## शिखरिणी.

अहा रे श्रीपार्था तुज कशि अवस्था घडियली ।
शशी-वंशीं कोणी मज हि न दिसे तो विर बळी ॥
स्वगर्वे तों दुर्योधन उठुनि बोले नृपवरा ।
तुला कैसें भासे मजहुनि बळी कोण दुसरा ॥ ८३ ॥
धरीं चापा हातीं म्हणत द्रुपदू कौरवपती ।
तुझी ते तों संख्या त्रिशर चवथा दे मजप्रती ॥
म्हणे तो विश्वात्मा तुज निज मुखें पांच दिधले ।
सुखें भेदीं यंत्रा वरिं निज कलत्रा भुजबळें ॥ ८४ ॥
धरीं चापा हातीं वर शर शिरीं लावुनि करें ।
कढे पाहें वक्त्रा वरि मिन सुनेत्रा विधि शरें ॥
रिकामा तो गेला मग कुरुज लावीत दुसरा ।
नभीं बाणा सोडी परि बहुत कांपे थरथरां ॥ ८५ ॥

## विबुधप्रिया.

तो हि व्यर्थ चि जाउनी मग तीसरा शर सोडिला ।
मच्छ ते सरसावले तंव भीष्म मोह चि पावला ॥
तो म्हणे दुरयोधना धनु टाकिं जीव किं त्यागिशी ।
होमिती तुज या क्षणीं अरि हे चि सर्व हि नेणसी ॥ ८६ ॥
जीव देशिल नोवरी मग कोण भोगिल निश्चयें ।
कासया अभिमान भोगिसि हातिंचें धनु टाकिं हें ॥
हांसती नृप हे त्वरें कर आंसडूनि च आणिला ।
बैसतां दुरयोधना नृप बोलती पण जिंकिला ॥ ८७ ॥

भूप बोलत सैंवरी बहु आसतां कुरुमंडळी ।
नंदिनी मम मंदिरीं रमणी वराविण राहिली ॥
श्रीहरी म्हण राजया नृप राहिले मुनितापसी ।
पाहें प्रार्थुनि त्यांसि जाउनियां त्वरें किति बोलसी ॥ ८८ ॥
कृष्णवाक्य चि ऐकतां नृपति त्वरें करि प्रार्थना ।
शक्तिसी तयिं त्या सभांतरिं धर्म बोलत अर्जुना ॥
ऊठिं पार्थ धनूसि घे मिन भेदुनी वरिं नोवरी ।
बंधु वंदुनि ऊठिला नमिला पदांबुजिं श्रीहरी ॥ ८९ ॥
घेउनी धनुबाण अर्जुन येउनी सभ ठाकला ।
देखतां नृप बोलतीच संसारिं हा बहु त्रासला ॥
अंगनेस्तव आंग सुंदर तप्त तैलिं हि घालितो ।
सल्य घालुनि सव्यसाचि कढाइ दृष्टिसि पाहतो ॥ ९० ॥
दर्भ घेउनियां करीं मग आठवीतस चाक्षुशी ।
ठाकतां कढ्यांतरीं मग स्पष्ट पाहत मच्छिसी ॥
धूम्र तो शमतांचि अंतरिं यंत्र निश्चळ राहिलें ।
अर्जुनें तळिं पाहुनी शर लावुनी वर भेदिलें ॥ ९१ ॥
मीनलोचनिं भेदुनी शर ऊतरी अवनीवरी ॥
ते क्षणीं नृप बोलती धन्य धन्य बोलुनि वैखरी ॥
बैसुनी मदमत्त हस्तिवरी वधू सभ पातली ।
माळ ते निज हस्तकें मग पार्थ कंठिं च घातली ॥ ९२ ॥
भीम येउनि द्रौपदीप्रति स्कांधिं घेउनि चालिला ।
धर्मअर्जुननाकुला सहदेव बोलत तो चला ॥
द्वारिं भूपति येउनी + + + रोधिती ।
भीम होउनियां पुढें नृप लोटतां पडती क्षिती ॥ ९३ ॥
मार्गिं त्या भिम चालतां नृप बाहुनें बहु मारिले ।
पांच ही जण ते कुलालगृहासि घेउनि पातले ॥
पुत्र बोलति माय भिक्ष हि आणिली तुज कारणें ।
स्नेहं जननि त्यांचि पांच हि बंधु वांटुनि घ्या म्हणे ॥ ९४ ॥

अनुष्टुप्.

मातृवचनें द्रुपदतनया पांच भोगिती ।
स्मरतां ही नित्य जीतें पातकें बहु नाशती ॥ ९५ ॥

## शार्दूलविक्रीडित.

श्रोते हो तुम्हि तों विचक्षण बहू मी बोलतां भीतसें ।
मी तों बालक तूमचें मजकडे पाहा कृपासौरसें ॥
नाहीं तों मज बुद्धि मंद मतिनें जें काव्य म्यां निर्मिलें ।
निर्दोषें करुनी अनंत विनवी हें पाहिजे भूषिलें ॥ ९६ ॥

समाप्त.

---

* भूषणकविकृत

# शिवराजभूषण.

## उपोद्घात.

### छप्पै.

जय जयंति जय आदिसकति जय कालि कपर्दिनि ।
जय मधुकैटभछलनि देवि जय महिषविमर्दिनि ॥
जय चमुंड जय चंडमुंडभंडासुरखंडिनि ।
जय सुरक्त जय रक्तबीज बिडालविहंडिनि ॥
जय निसुंभसुंभद्दलनि भनि भूषण जयजय भननि ।
सरजा समथ्थ सिवराज कहँ देहि विजय जय जगजननि ॥ १ ॥

### दोहा.

तरनि जगतजलनिधितरनि जै जै आनंदओक ।
कोककोकनदसोकहर लोकलोकआलोक ॥ २ ॥
राजत है दिनराजको वंस अवनि-अवतंस ।
जामै पुनि पुनि अवतरे कंसमथन प्रभु-अंस ॥ ३ ॥
महावीर ता वंसमै भयो एक अवनीस ।
लियौ बिरद सीसौदिया दियो ईसकों सीस ॥ ४ ॥
ता कुलमै नृपवृंद सब उपजे बखतबिलंद ।
भूमिपाल तिनमै भयो बडो मालमकरंद ॥ ५ ॥
सदा दानकिरवानमै जाके आनन अंभ ।
साहि निजाम सखा भयो दुग्गदेवगिरिखंभ ॥ ६ ॥
याते सरजा विरद भो सोभित सिंघप्रमान ।
रनभूसिलासु भौसिला आयुषमानसुमान ॥ ७ ॥
भूषनि भनि ताके भयो भुवभूषन नृप साहि ।
रात्योंदिन संकित रहैं साहि सबै जगमाहिं ॥ ८ ॥

### कवित्त.

एते हाथी दिए मालमकरंदजू के नंद जेते गनि सकति विरंचि हू की न तिया ।

---

* मल्हार रामराव चिटणीसकृत शिवछत्रपतिचरित्र विविधज्ञानविस्तार मासिकपुस्तककर्त्यांनीं छापाविलें आहे. त्याचे ७० व ७१ ह्या दोन पृष्ठांत हा भूषणकवि, ह्याचा वडील बंधु चिंतामणि, व ह्याचे शिवभूषणकाव्य ह्यांचा उल्लेख आलेला आहे तो पहा.

भूषन भनत जाकी साहिबी सभाके देखे लागें और सब छितिपाल छितिमे छिया ॥
साहस अपार हिंदवानको अधार धीर सकल सिसोंदिया सपूत कुलको दिया ।
जाहिर जहांन भयो साहिजू खुमानवीर साहिनको सरन सिपाहिनको तकिया ॥ ९

**दोहा.**

दसरथके जो राम भो बसुधोके गोपाल ।
सोई प्रगट्यो साहिके श्रीसिवराजभुवाल ॥ १० ॥
उदित होत सिवराजके मुदित भए द्विजदेव ।
कलजुग हट्यो मिट्यो सकल म्लेच्छनिको अहमेव ॥ ११ ॥

**कवित्त.**

जा दिन जनम लीनो भूपर भूसिला भूप ताही दिन जीत्यो अरिउरके उछाह को ।
छठी छत्रपतिनको जीत्यो भाग अनयास जीत्यो नामकरनमैं करन प्रवाहको ॥
भूषन भनत बाललीला गढकोट जीते साहिके सिवाजी करि त्यहूं चक्क चाहको ।
गोलकुंडा बीजापुर जीत्यो लरिकाइहिमैं ज्वानी आए जीत्यो दिल्लीपति पातशाहको ॥ १२ ॥

**दोहा.**

दच्छिनके सब दुग्ग जिति दुग्ग साहइविलास ।
सिवसेवक सिवगढपती कियो राजगढवास ॥ १३ ॥

**राजगढवर्नन—सवैया.**

जापर साहितनै सिवराज सुरेसकी ऐसी सभा सुभ साजै ।
यौं कवि भूषन जंपत है लखि संपतिकों अलकापति लाजै ॥
तामधि तीनिहूं लोककी दीपति ऐसो बडो गढराज विराजै ।
वारि पतालसीमाची मही अमरावतिकी छवि ऊपर छाजै ॥ १४ ॥

**हरिगीत.**

मनिमय महल सिवराजके इमि राजगढमैं राजहीं ।
लखि जक्ष किंनर सुर असुर गंध्रर्व हौंसनिसाजहीं ॥
उत्तंग मरकतमंदिरनि मधि बहु मृदंगयों वाजहीं ।
घन समर मानहु घुमडि करि घन घनपटल गल गाजहीं ॥
मुकुतानिकी झालरनि मिलि मानि लाल छज्जा छाजहीं ।
संध्यासमै मानहुं नखतगन लाल अंबर राजहीं ॥
जहां तहां ऊरध उठे हीरा किरनसमुदाय हैं ।
मानौं गगन तंबू तन्यौ ताके सपेत तनाय हैं ॥
भूषन भनत जहें परसिके मनिपुहुपरागनकी प्रभा ।

प्रभुपीतपटकी प्रगट पावत सिंधुमेघनकी सभा ॥
मुख नागरिनके राजहीं कहु फटिक महलन संगमैं ।
लसै अमल कोमल कमल मानहुं गगनगंग तरंगमैं ॥
आनंदसौं सुंदरिनके कहु इंदुवदन उदोत है ।
नभसरितके प्रफुल्लित कुमुद कलित कमलकुल होत है ॥
कहु बावरी सर कूप राजत बद्धमनिसोपान है ।
जहं हंस सारस चक्रवाक बिहार करत गुमान हैं ॥
कितहूं विसाल प्रवालजालनि जटित अंगनभूमि है ।
जह ललितवागनि द्रुम लतानि मिलि रहे झिलिमिलि झूमि है ॥
चंपा चमेली चारु चंदन चारिं हूं दिसि देखिए ।
लवली लवंग इलानिकेरे लाखहीं लागि लेखिए ॥
कहु केतकी कदली करौंदा कुंद अरु करवीर हैं ।
कहु दाख दारिम सेव कटहर तूत अरु जंबीर हैं ॥
कितहूं कदंबकदंब कहुं हिंताल ताल तमाल हैं ।
पीयूष ते मीठे फले कितहूं रसाल रसाल हैं ॥
पुंनाग कहुं कहुं नागकेसरि कितहूं बकुल असोक है ।
कहुं ललित अगर गुलाब पाटलपटल बेला थोक है ॥
कितहूं निवारी माधवी सिंगारहार कहूं लसैं ।
जहँ भांति भांति निरंग रंग विहंग आनंदसों रसैं ॥ १५ ॥

छप्पै.

लसत विहंगम बहुत बहु भांति बागमहँ ।
कोकिल कीर कपोत केलि कलकल करंत तहँ ॥
मंजुल महरि मयूर चदुल चातक चकोरगन ।
पियत मधुर मकरंद करत झंकार भृंग घन ॥
भूषन सुवासु फल फूल जुत छहुं रितु वसत वसंत जहँ ।
इमि राजदुग्ग राजत रुचिर अति सुखद सिवराज कहँ ॥ १६ ॥

दोहा.

तहां राजधानी करी जीति सकल तुरकान ।
सिवसरजा रुचि दानमैं कीनो सुजसु जहान ॥ १७ ॥
देसनि देसनि ते गुनी आवत जाचन ताहि ।
तिनमै आयो एक कवि भूखन कहियतु जाहि ॥ १८ ॥
द्विज कनौज कुल कश्यपी रतनाकरसुत धीर ।


अनुक्रमणिका

वसत त्रिविक्रमपुर सदा तरनितनूजातीर ॥ १९ ॥
सिवचरित्र लखि यों भयो कविभूषनके चित्त।
भांति भांति भूषननिसों भूषित करौं कवित्त ॥ २० ॥
सुकविनहूकी कृपा कछु समुझि कविनको पंथ।
भूषन भूषनमय करत सिवभूषनमय ग्रंथ ॥ २१ ॥
कुल सुलंख चित्रकूटपति साहससील समुद्र।
कविभूषण पदवी दई हृदयरामसुत रुद्र ॥ २२ ॥
भूषन सब भूषननिमें उपमैं उत्तम चाहि।
यातें उपमै आदिदैं बरनत सकल सराहि ॥ २३ ॥

---

## ग्रंथारंभ.

### उपमा—दोहा.

**जहां दुहुनको देखिये सोभा बनत समान।**
**उपमा भूषन ताहि कों भूषन कहत सुजान ॥ १ ॥**
**जाको बरनन कीजिए सो उपमेय प्रमान।**
**जाकी सरवर कीजिए ताहि कहत उपमान ॥ २ ॥**

### उदाहरण—कवित्त.

मिलत हीं कुरुषचकत्ताको निरखि कीन्ह्यो सरजा सहसज्यों उचित व्रजराजको।
भूषन कोमिसि गैर मिसिलष रोकिये कोकिए म्लेछ मुराहित करिकैगराजको ॥
अरेते गुसलखांने बीच ऐसे उमराय लै चले मनाय महाराज सिवराजको।
दाबेदार को लखि रिसानो दीहदलराय जैसे गडदार अडदार गजराजको ॥१॥

### सवैया.

साइसभिस्त सुजोधनसो औ दुसासनसौं जसवंत निहार्‍यों।
द्रोणसोभाउ करंन करंनसो और सबैदल सौंदलभार्‍यों ॥
ताहि विगोइ सिवा सरजा भनै भूषन ऐलिफतैयों पछार्‍यौ।
पारथके पुरुषारथ भारथ जैसे जगाय जयद्रथ मार्‍यौ ॥ २ ॥

### कवित्त.

आवतहीं दरबार बिललाने छरीदार देखि जापिता करनहार नेक हू न मनके।
भूषन भनत भौसिलाके आगे आइ वाजे भये उमराय जन तुजक करनके ॥
साहि रह्यो जाकि सिव साहि रह्यो ताकि और चाहि रह्यो चकि वने व्योत अनवनके।
ग्रीषमको भानुसों खुमानको प्रताप देखि तारे सम तारे गए मूदि तुरकनके ॥३॥

अनन्वय—दोहा.

जहां करत उपमेयको उपमेयै उपमान ।
ताहि अनन्वै कहतहैं भूषन सब मतिमान ॥ ३ ॥

उदाहरण—सवैया.

साहितनै सरजा तुव द्वार प्रतीदिन दानकि दुंदुभि बाजै ।
भूषन भिच्छुक भीरनको अतिभोजहुते बढि मौजनि साजै ॥
राजनको गन राजनिको गन साहिनमे नहिं यों छवि छाजै ।
आजु गरीबनिवाज महीपर तो सो तुंही सिवराज विराजै ॥ ४ ॥

प्रतीप—दोहा.

जहं प्रसिद्ध उपमानको कवि बरनत उपमेय ।
तहं प्रतीप उपमा कहत भूषन गाथ प्रमेय ॥ ४ ॥

उदाहरण—सवैया.

छाइ रही जितही तितहीं अतिही छवि छीरधिरंग करारी ।
भूषन सुद्ध सुधानकै सोधनि सोधत सीधरि ओप उज्यारी ॥
यों तमतोमाहिं चाबिकै चंद चहूं दिसे चांदनि चारु पसारी ।
ज्यौं अफजल्लहि मारि महीपर कीरति श्रीसिवराज बगारी ॥ ५ ॥

दोहा.

जहं बरनत उपमेयतै हीनो करि उपमान ।
तासों कहै प्रतीप हैं भूषन सुकवि सुजान ॥ ५ ॥

उदाहरण—सवैया.

... पंथवृंद कहा अरु चंद कहा सरजा जसु आगे ।
भूषन भानु कृसानु कहा व खुमानु प्रताप महीतल पागे ॥
राम कहा द्विजराम कहा बलराम कहा रनमै अनुरागे ।
बाज कहा मृगराज कहा अति साहसमै सिवराजके आगे ॥ ६ ॥

सवैया.

यों सिवराजको राज अडोल कियो सिवजोव कहां ध्रुव धू है ।
काम नादानि खुमान लखे न कछू दिवबृक्ष न देवगऊहै ॥
भूषन भूपनमैं कुलभूषन भौंसिला भूप धरे सब भूहै ।
मेरु कछू न कछू दिगदंतिन कुंडलि कोल कछू न कछू है ॥ ७ ॥

उपमेयोपमा—दोहा.

जहां परस्पर होत है उपमेयौ उपमान ।
भूषन उपमेयोपमा ताहि बखानत जान ॥ ६ ॥

उदाहरण–कवित्त.

तेरो तेज सरजा समथ्य दिनकरसो है दिनकरसोहै तेरे तेजके निकरसो ।
भौसिला भुवाल तेरो जस हिमकरसो है हिमकरसोहै तेरे जसुके अकरसो ॥
भूषन भनत तेरो हियो रतनाकरसो रतनाकरौ है तेरे हिय सुख करसौं ।
साहिके सपूत सिव साहिदानि तेरे करु सुरतरुसों है सुरतरु तेरे करसो ॥ ८ ॥

मालोपमा—दोहा.

जहां एक उपमेयके होत बहुत उपमान ।
ताहि कहत मालोपमा भूषन सकल सुजान ॥ ७ ॥

उदाहरण—कवित्त.

इंद्र जिमि जंभपर बाडव ज्यों अंभपर रावन सदंभपर रघुकुलराज है ।
पौन वारिवाहपर संभु रतिनाहपर ज्यौं सहस्त्रबाहपर राम द्विजराज है ॥
दावा द्रुमदंडपर चीता मृगझुंडपर भूषन वितुंडपर जैसे मृगराज है ।
तेज तमअंसपर कान्ह जिमि कंसपर त्यौं मलेच्छवंसपर सेर सिवराज है ॥९॥

ललितोपमा—दोहा.

जहं समताको दुहुनकी लीलादिक पद होत ।
ताहि कहत ललितोपमा सकल कविनके गोत ॥ ८ ॥

उदाहरण—दोहा.

बहसत निदरत हंसत जहं छवि अनुसरित बखानि
सत्रु मित्र इमि भ... लीलादिक पद जानि

कवित्त.

साहितनै सरजा सिवाकी सभा जामधि है मेरुवारी सुरकी सभाकौ ॥
भूषन भनत जाके एक एक सिखर ते केतिक घोन दिनके सोतवे तरति है
जोन्ह को हंसति जोति हीरमनिमंदिरनि कंदरनि मैं छबि कुहूकि उघरति है
ऐसो ऊंचो दुरग महाबली है जामे नखतावलीसो वहंसिदिपावली धरति है १

रूपक—दोहा.

जहां दुहुनको भेद नहिं बरनत सुकवि सुजान ।
रूपक भूषन ताहिको भूषन कहत प्रमान ॥ ९ ॥

### उदाहरण—छप्पै.

कलिजुग जलधि अपार उद्ध अधरम्म उर्मिमय ।
लच्छनि लच्छमलिच्छ कच्छ अरु मच्छ मगरचय ॥
नृपति नदीनदवृंद होत जाको मिलि नीरस ।
भनि भूषन सब भुम्मि घेरि किन्निय सुअप्प बस ॥
हिंदवान पुण्यगाहकावनिकता सुनिवाहक साहि सुव ।
बरद बावानकिरवान धरि जसु जिहाज सिवराज दुव ॥ १२ ॥

### छप्पै.

साहिनमनसमरथ्थ जासु अवरंग साहि सिरु ।
इदै जासु अव्वासु साहि वहल विलास थिरु ॥
एदलसाहि कुतुब्ब जासु भुजजुग भूषन भनि ।
पाइ म्लेच्छ उमराय काय तुरकान और गनि ॥
यह रूप अवनि अवतार धरि जिहि नालिम जग दंडियव ।
सरजा सिव साहस खग्ग गहि कलिजुग सोइ खल खंडियव ॥ १३ ॥

### कवित्त.

सिंघ धरि जानै विन जावली जंगल भटी हठी गज एदिल पठाइ करिभटक्यो ।
भूषन भनत देखि भभरि भगानो सब हिंमति हियेमें धरि काहुवै न हटक्यो ॥
साहिके सिवाजी गाजी सरजा समथ्थ महा मदगल अफजलै पंजाब लपटक्यो ।
ताविगरहै करि निकाम निजधाम कह आकत महाउत लै आकुस लै सटक्यो॥१४॥

### रूपकभेद—दोहा.

घटि वढि जह बर्नन करै करिकै दुहुन अभेद ।
[illegible] कवि औरौ कहत है रूपकको भेद ॥ १० ॥

### उदाहरण कवित्त.

साहितनै सिवराज भूषन [illegible] कलंक चंदउर आनियतु है ।
एकहि आनन पंच आनन गनित तोहि गजानन वदनविना वखानियतु है॥
एकसीस ही सहससीस कला करिवेको दुहुंदगसो सहसदग मानियतु है ।
[illegible]हूं करसो सहसकर मानियतु तोहि दुहू बाहसो सहसबाहु जानियतु है ॥१५॥

### कवित्त.

[illegible]ते है पहार भुवमद्धि पारावार तिनसुनिकै अपार कृपा गहै सुखफल है ।
भूषन भनत साहितनै सरजाके पास आइवेको बढीउर हौसनकी ऐल है ॥
[illegible]रवान वजसो विपच्छ करिवेकै डर आइ है कितेकौ आए सरनको गल है ।
[illegible]घवा महीमे आनि सिव है महिरवान कोट करि सकल सपक्ष किए सैल है ॥१६॥

परिणाम—दोहा.

जहँ अभेदकरि दुहुंनसों करत और स्वैकाम।
भनि भूषन सब कहत हैं तासु नाम परिनाम ॥ ११ ॥

उदाहरण—सवैया.

भूषन तीषन तेज तरन्निसों वैरिनको कियो पानिप हीनों।
दारिददौ करि वारिदसौं दलि त्यौं धरनीतल सीतल कीनों ॥
भौंसिला भूप बली भुवको भुज भारी भुजंगमसौं भरुलीनौ।
साहितने कुलचंद सिवा जसचंदसों चंद कियो छवि छीनों ॥ १७ ॥

उल्लेख—दोहा.

कै बहुतैकै एक जहँ एक वस्तुको देखि।
बहु विधिकर उल्लेख हैं सो उल्लेखि उलेखि ॥ १२ ॥

उदाहरण—सवैया.

एकै कहैं कलपद्रुम है इमि पूरतु है सबकी चितचाहै।
एकै कहैं अवतार मनोजको यों तनमें अति सुंदरता है ॥
भूषन एकै कहैं महि इंदुयों राजु विराजतु वाढ्यौ महा है।
एकै कहैं नरसिंघ है संगर एकै कहैं नरसिंघ सिवा है ॥ १८ ॥

कवित्त.

पैज प्रतिपाल भूमिभारको हमाल चहूं चक्कको अमाल भयो दंडत नहानको।
साहिनको साल भयो ज्वारको जवाल भयो हरको कृपाल भयो हारके विधानको ॥
बीररस ख्याल सिवराज भुवपाल तुव हाँथको विसाल भयो भूषन वखानको।
तेरो करवाल भयो दक्षिणको ढाल भयो हिंदको दिवाल भयो काल तुरकानको ॥ १९ ॥

स्मृति—दोहा.

समसोभा लखि आनकी सुधि आवत जे[illegible] ।
स्मृति भूषन तासों कहत [illegible] कवि सिरमोर ॥ १३ ॥

उदाहरण—कवित्त.

तुम सिवराज ब्रजराज अवतार आजु तुमही जगतकाज पोषत भरत हौ।
तुम्हैं छाडि यातें काहि बिनती सुनाऊं मैं तिहारे गुण गाऊं तू ढीलक्यों धरत हौ ॥
भूषन भनत वह कुलमैं न भयो न गुनाहक छुठायो क्यौं न चित्त हि हरत हौ।
और ब्राह्मननि देखि करत सुदामा सुधि मोहि देखि काहे सुधि भृगुकी करत हौ ॥ २० ॥

भ्रम—दोहा.

आन बातको आनमैं होत जहीं भ्रमु आनि।
तासोंभ्रमु सब कहत है भूषन कविमत जानि ॥ १४ ॥

उदाहरण—सवैया.

पीय पहारनि पासन जाहु यौंतीय वहादुरसों कह सोषैं ।
कोन बचै है नवाब तुम्है भनै भूषन भोंसिला भूपके रोषैं ॥
बंदि कियो इहो साइस्तखां जसवंतसे भाउ करंनसे दोषैं ।
सिंघ सिवानिके वीरनसो गो अमीर निवांचि गुनीजन घोषैं ॥ २१ ॥

संदेह—दोहा.

कै यह कै वह यों जहां होत आनि सदेह ।
भूषन सो संदेह है यामे नहीं संदेह ॥ १५ ॥

उदाहरण—कवित्त.

आवत गोसलखाने ऐसे कछू त्योरठानै जान्यों अवरंगजूके प्र नको लेवा है ।
रसखोट भय एतै अगोट आग्रेमें सातैं चौकीनाकि आइ घरकीनी हद रेवाहै ॥
भूषन भनत यह चहूं चक्क चाह कियो पातसाह चकताकी छाती मह छेवा है ।
जान्यो न परतु ऐसे काम है करतु कोऊ गंधरव देवा है कै सिद्ध है कि सेवा है ॥ २२ ॥

अपन्हुति—दोहा.

आन बात आरोपिए साची बात दुराइ ।
सुद्ध अपन्हुति तिहि कहत भूषन सब कविराइ ॥ १६ ॥

उदाहरण—कवित्त.

चमकती चपला न फिरत फिरंगै भट इंद्रको न चांपतरु वैरष समाजको ।
धाए धुरवान छाए धुरके पटल मेघ गाजि वो नवाजिवो है दुंदुभि दुवाजको ॥
भौंसिलाके डरनि डरानी रिपुरानी कहै पिय भजो देखि उदो पावसकी साजको ।
घनकी घटा न गजघटनिसनाह साजै भूषन भनत आयो सेन सिवराजको २३

हेत्वपन्हुति—दोहा.

जहां जुगतिसों आनको कहियै आन छपाइ ।
हेतुअपन्हुति कहत है तासौं कविसमुदाइ ॥ १७ ॥

उदाहरण—दोहा.

सिव सरजाके करलसै सो न होइ किरवांन ।
भुजभुजगेस भुजंगनी भषति पौन अरिप्रान ॥ २४ ॥

पर्यस्तापन्हुति—दोहा.

वस्तु गोइताको धरम आन वस्तु मै रोपि ।
परजस्तापन्हुति कहत कवि भूषन मतिओपि ॥ १८ ॥

अनुक्रमणिका

उदाहरण—दोहा.

काल करत कलिकालमैं नहि तुरकनको काल ।
काल करत तुरकानको सिवसरजा करवाल ॥ २५ ॥

भ्रांतापन्हुति—दोहा.

**संक आपनी होत ही जहँ भ्रमु कीजै दूरि ।**
**भ्रांतापन्हुति कहत हैं तह भूषन कवि भूरि ॥ १९ ॥**

उदाहरण—कवित्त.

साहितनै सरजाकी भयसौं भगाने भूप मेरुके लुकाने ते लहत जाइ ओक हैं ।
भूषन तहां ऊमर हट पतिके प्रताप पावत नकल अतिकौतुक उदोत है ॥
सिव आयो सिव आयो संकरके आगमन सुनिकै परान ज्यौं लगत अरिगोत है ।
सिव सरजा न यह सिव है महेस तब यों कै उपदेस यक्षरक्षकसे होत हैं २६

सवैया.

एक समै सजिकै सब सैन सिकारको आलमगीर सिधाए ।
आवत है सरजा समऱ्यो यक और तै गोलनि बोलजताए ॥
भूषन भो भ्रमु औरंगके सिव भौंसिला भूपकी धाक धुकाए ।
धाइकै सिंघ कह्यो समुझाइकै रौलनि आइ अचेत उठाए ॥ २७ ॥

छेकापन्हुति—दोहा.

**जहां औरकी संक करि सांच छपावत बात ।**
**छेंकापन्हुति कहत हैं भूषन मतिअवदात ॥ २० ॥**

उदाहरण—दोहा.

तिमिरवंसहर अरुनकर आयो सजनी भोर ।
सिव सरजा चुप रहि सखी सूरज सुरसिर मौर ॥ २८ ॥

कैतवापन्हुति—दोहा.

**जहँ कैतवछलव्याजमिस इनसों होत दुराव ।**
**कहत कैतवापन्हुति हि भूषन कवि सदभाव ॥ २१ ॥**

उदाहरण—दोहा.

दुग्गबलय जन प्रबल सरजा जीत्यो रनमांहि ।
औरंग कहैं दिवानसों सपन सुनावत ताहिं ॥ २९ ॥
सुनि सुउजीरनयों कह्यो सरजा सिव महाराज ।
भूषन कहि चकतासकुचि नहि सिकार मृगराज ॥ ३० ॥

अनुक्रमणिका

### कवित्त.

साहिनके सिछक सिपाहिनके पातसाह संगरमै सिंघ कैसे जिनके सुभाउहै।
भूषन भनत सिवसरजाकी धाकै ते वे कौंपत रहत चित गहतन चावहै ॥
अफजलकी अगति साइस्तखांकी अपति बहलोलकी विपति सुनि डरे उमराउ है।
पक्कामतौ करिकै मलेच्छ मन सब छोडि मक्काहिके मिसि उतरत दरियाउहै ३१

### उत्प्रेक्षा---दोहा.

**आन बातको आनमै जहै संभावन होइ।**
**वस्तु हेतु फल जुत कहत उत्प्रेक्षा है सोइ ॥ २२ ॥**

### उदाहरण---सवैया.

दानव आयो दगा करि जावली दिग्ध भयारो महामद भाऱ्यो।
भूषन बाहुबली सरजा हि मुभेटिवेकोनिरसंक पधाऱ्यो ॥
बीछूके घाय गिरे अफजल्ल हि ऊपर ही सिवराज निहाऱ्यो।
दाबियों बैठ्यो नरिंद अरिंदहि मानौ मयंद गयंद पछाऱ्यो ॥ ३२ ॥

### सवैया.

साहितनै सिवसाहि निसामैं निसाँ कलियो गढसिंह सुहानौ।
राठिवरौको संहार भयो भिरिकैसिरदार गिऱ्यो उदैभानो ॥
भूषनयों घमसान भो भूतलघेरत लोथनिमानो महानो।
ऊंचे सुछज्जछताउचटी प्रगटी परभा परभातकी जानो ॥ ३३ ॥

### कवित्त.

दुरजनदार भजि भजिवे सम्हार चढीं उत्तर पहार डरि सिवाजी नरिंद ते।
भूषन भनत विनभूषन वसन सव्वै भूषन पिया सब है नाहनिके निंदतैं ॥
बालक अयानैं वाटवीच ही विलानैं कम्हिलानैं मुखकोमल अमल अरविंद ते।
..अरु फज्जल कलित बढं [illegible] रानितनूजाको कालिंद ते ३४

महाराज सिवर [illegible] धवलधुवकित्ति।
छविछटानि सौं छुहतिसी छितिअंगनादिगभित्ति ॥ ३५ ॥

### कवित्त.

लूटयो खान दौरा जोरावर सफजंग अरु लद्योकार तलबखां मनहु अमाल है।
भूषन भनत लूटयो पूनमै साइस्तखान गढनिमे लूटयो त्यों गढो इनिको जाल है॥
हेरि हेरि कूटिसल हेरि बीच सरदार घेरि घेरि लूटयो सब कटक कराल है।
मानों हय हाथी उमराव करि साथी अवरंग डरि सिवाजी पै भेजत रसाल है
॥ ३६ ॥



अनुक्रमणिका

दोहा.

दुवन सदन सबके वदन सिव सिव आठों जाम ।
निज वचिवेको जपत जनु तुरकौ हरकौ नाम ॥ ३७ ॥

दोहा.

**मानौ इत्यादिक वचन आवत नहिं जिहिं ठौर ।**
**उत्प्रेच्छा गनिगुपतिसौं भूषन भनत अमोर ॥ २३ ॥**

उदाहरण—कवित्त.

देखत उचाई उदरातिपाग सूधी राहधौसहूमैं चढे तेजे साहस निकेत है ।
सिवाजी हुकुम तेरो पाइपैदल निसल हेरि परनालेसे जीते जनुषेत है ॥
सावन भादौंकी भारी कुहूकी अंध्यारी चढि दुग्गपर जात मावलाबल सचेत है ।
भूषन भनत ताकी वातमैं बिचारी तेरे परताब रविकी उज्यारी गढ लेत है ॥३८॥

दोहा.

और गढो ई नदीनद सिवगढपाल दय्याव ।
दौरि दौरि चहु और ते मिलत आनि यह भाव ॥ ३९ ॥

रूपकातिशयोक्ति—दोहा.

**ग्यान करत उपमेयको जहं केवल उपमान ।**
**रूपकातिसयउक्ति तहं भूषन कहत सुजान ॥ २४ ॥**

उदाहरण—कवित्त.

वासवसे विसरत विक्रमकी कहा चली विक्रम लखत वीर वखत बिलंदके ।
जाके तेज वृंद सिवाजी नरिंद मसरंद भालमकरंदकुलचंद साहिनंदके ॥
भूषन भनत जाके वैर वैर नैर निमै होत अचरिज घर घर दुखंददके ।
कनकलतानि इंदु इंदुनिमैं अरविंद झरैं अरविंदनि तैं बुंद मकरंदके ॥ ४० ॥

भेद[illegible]हा.

**जहँ तहँ आनहि भांतिके वरनै वात कछूक ।**
**भेदकातिसयउकुति सो भूषन कहत अचूक ॥ २५ ॥**

उदाहरण—कवित्त.

श्रीनगर नयपाल जुमिलाके छितपाल भेजत रसाल चौर गूढ कुही वाजकी ।
मेवार ढूंढार मारवार औ बुंदेलखंड झारखंड वांधौ धनी चाकरी इलाजकी ॥
भूषन जे पूरब पछाह नरनाह ते वै ताकत पनाह दिल्लीपति सिरताजकी ।
जगत को जेतवार जीत्यो अवरंगजेब न्यारी रीति भूतलनिहारी सिवराजकी
॥ ४१ ॥

| नुक्रमनंबर | ग्रंथाचें नांव. | कि०. रुपये. | कि०. आ०. | ह० हां०. आ० | ह० हां०. पै. |
|---|---|---|---|---|---|
| | **संस्कृत ग्रंथ.** | | | | |
| ६ | कालेय कुतुहलम् नाम प्रहसन * ... ... | ० | ५ | ० | ६ |
| ७ | शिवकाव्य पूर्वार्द्ध–पुरुषोत्तम पंडितकृत ... ... | १ | ८ | २ | ० |
| ८ | पंत विठ्ठल कविकृत–सुश्लोक लाघव. ... ... | १ | ५ | १ | ६ |
| ९ | युवराज कविकृत–रामकाव्य. ... ... ... | १ | ० | १ | ६ |
| १० | वेदांत केसरी–शंकराचार्यकृत ... ... ... ... | ० | ९ | १ | ० |
| ११ | शिवकाव्य उत्तरार्द्धम्-पुरुषोत्तम पंडित कविकृत ... | १ | ५ | १ | ० |
| १२ | पंत विठ्ठलकविकृत गजेन्द्रचंपू ... ... ... ... ... | ० | ८ | १ | ६ |
| १३ | लघुकाव्यानि–अनेककविकृत प्रकरणें ... ... ... ... | २ | ० | २ | ६ |
| | राजव्यवहार कोश ... ... ... ... ... | ० | ३ | ० | ६ |
| | अमरू शतक ... ... ... ... ... | ० | ६ | ० | ६ |
| | पुष्पबाण विलास ... ... ... ... ... | ० | १॥ | ० | ६ |

ज्यांच्या नांवावर * अशी फुली केली आहे तीं प्रकरणें सुटीं आहेत. बांधिलीं नाहींत, बांधून पाहिजे असल्यास त्याबद्दल खर्च ८१ आणा निराळा पडेल.



अनुक्रमणिका

# सूचना.

(१.) सन १८७८ पासून तों सन १८८७ अखेर पर्यंत ज्यांस अंक पाहिजे असतील त्यांणीं दर सालचे १२ अंकांस ५ रु० ५ आणे प्रमाणें आम्हांकडे किंमत पाठविली असतां त्यांजकडे रवाना होतील, फुटकळ अंकास ०८०६ प्रमाणें पाठविले असतां अंक रवाना होतील.

(२.) वर्गणी खालीं लिहिलेले गृहस्थांकडे पाठविली असतां आम्हांस पोंचेल.

रा. रा. श्रीधर गणेश जिन्सीवाले एम. ए. प्रोफेसर ....मुंबई.

" " कृष्णाजी महादेव जोगळेकर एम. ए. असिस्टंट डायरेक्टर पब्लिक इन्स्ट्रक्शन..............बडोदा.

" " जनार्दन बाळाजी मोडक बी. ए. हायस्कूल ....ठाणें.

" " सावळाराम माधव नायब सायेर .... .. .. .... इंदूर.

" " अनंत रामचंद्र चांफेकर अ० मा० सिटिस्कूल. नागपूर.

" " वामन दाजी ओक असि० मा० ..........संबळपूर.

" " रामचंद्र रघुनाथ नातू अ० मा० हायस्कूल..बेळगांव.

" " गंगाधर पांडुरंग गद्रे अ० मा० हायस्कूल, कोल्हापूर.

" " परशुराम भिकाजी भाटये वकील ..........रत्नागिरी.

" " विष्णु मोरेश्वर महाजनी, एम. ए. ........उमरावती.

" " अण्णाजी रामचंद्र आत्रे हे० मा० हायस्कूल,....मिरज.

" " गोविंद रामचंद्र केळकर इंग्लिश मास्तर.........वसई.

(३.) हें पुस्तक सर्वांस घेण्यास सुलभ पडावें म्हणून याची किंमत वर्षास आगाऊ ४ रुपये ट० ह० ०६, मागाहून ५ रुपये ०८. आगाऊची मुदत पुस्तक घेऊं लागल्यापासून दोन महिन्यांचे आंत समजावी. पोष्टाचीं तिकिटें पाठविणें झाल्यास तीं अर्धा आणा किंमतीचीं असावीं व रुपयास ०८०६ प्रमाणें वर्तावळा पाठवावा.

(४.) ह्या पुस्तकासंबंधानें पत्रव्यवहार, मनिआर्डरी वगैरेचा करणें तो:-काव्येतिहास-संग्रह व्यवस्थापक ठाणें ह्या पत्त्यावर करावा.

अनुक्रमणिका